**महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना सन २०१५-१६ या आर्थिक वर्षा मधील भाग भांडवल अंशदान मंजूर करण्याबाबत.**
**(लेखाशिर्ष - ४४२५- ०४७२)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविम-१०१५/प्र.क्र.२१/का.३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीखः ३ जुलै, २०१७.

**वाचा :-**

१) सामाजिक न्याय व क्रिडा विभाग शासन निर्णय क्र. TDC १०७७/१३७३३/XXIV(II), दि.०६.०२.१९८२

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.आविम-२००४/प्र.क्र.१५/का.-३, दि. २४/८/२००४.

३) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.आविम-१०१६/प्र.क्र.१८/का.-३, दि. ३०/०३/२०१६

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.:- आविम/प्रशा/जन./४०६७/१७, दि. ०८/०३/२०१७.

**प्रस्तावना:-**

१. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांनी उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील त्यांच्या दि. ०८.०३.२०१७ च्या पत्रान्वये सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील मंजूर वितरित भाग भांडवल अंतर्गत म.औ.वि. महामंडळ मौजे देवरी जि. गोंदिया यांचेकडुन प्राप्त झालेल्या भुखंडावर मौजे देवरी जि. गोंदिया येथील गोदाम बांधकामाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मौजे देवरी जि. गोंदिया यांचेकडुन प्राप्त झालेल्या भुखंडावर १ गोदाम बांधकामासाठी व इ. अनुषंगिक खर्च या करीता महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास रु. ३.०० कोटी (रुपये तीन कोटी फक्त) च्या खर्चास या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना संदर्भाधीन उपरोक्त अ.क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या भाग भांडवली अंशदान रु. १०.०० कोटी पैकी रु. ०३.०० कोटी फक्त (अक्षरी रुपये तीन कोटी मात्र) उपरोक्त गोदामाच्या बांधकामासाठी खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त रक्कम ज्या बाबींकरिता मंजूर करण्यात आली आहे त्याच बाबींवर खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

३. महाराष्ट्र राज्य आदिवासी सहकारी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांनी खर्चाबाबतचा अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना तसेच शासनास सादर करावा.

४. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले सर्व वित्तीय नियम, बजेट व कोषागार नियमावली, शासन आदेश/ निर्णय व CVC ची मार्गदर्शक तत्त्वे, CAG चे निदेश इत्यादींचे अनुपालन करावे. त्याचप्रमाणे महालेखापालांचे आक्षेप येणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०३११४५३४३२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2017.07.06 17:11:49 +05'30'

**( ल.गो. ढोके )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६) वित्त विभाग (व्यय-१४, साऊ), मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
८) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.